अपंग व्यक्ती (समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ च्या अनुषंगाने केंद्र शासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार पशुसंवर्धन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील गट अ, गट ब, गट क व गट ड मधील पदांवर शारिरीकदृष्ट्या अपंगांसाठी सुयोग्य पदे निश्चित करणेबाबत

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. पसंप्र-२०११/प्र. क्र. ४/पदुम-१
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १३ जानेवारी, २०११.

**वाचा:** १. अपंग व्यक्ती ((समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१))
२. शासन परिपत्रक सा प्र वि क्रमांक एसआरव्ही १०९८/प्र. क्र. १२/१६ अ दि. ०२/०५/१९९८
३. पसंप्र १०९८/५१५५/प्र.क्र. २३/पदुम-१ दि. ३० नोव्हेंबर १९९८ चा शासन निर्णय
४. पसंप्र १०९८/५१५५/प्र.क्र. २३/पदुम-१ दि. २१ ऑगस्ट १९९९ ची अधिसुचना
५. पसंप्र १०९८/प्र.क्र. ९७/पदुम-१ दि. १० फेब्रुवारी २००५ चा शासन निर्णय
६. शासन निर्णय क्र. पसंप्र २४०८/प्र.क्र. २६४/पदुम-१ दि. ११ फेब्रुवारी २००९
७. शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३ दि. ३ ऑगस्ट २०१०.
८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१ यांचे पत्र क्र. एनजीओ-४/१२०४/३२/२०११ पसं-१ दि. ०९/०१/२०११

**प्रस्तावना**

अपंग व्यक्ती ((समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१)) हा अधिनियम दि. ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागु केला आहे. या अधिनियमाच्या अनुषंगाने शासनाने सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २ मे, १९९८ अन्वये शासन सेवेत अंध, बहिरेपणा व अस्थिव्यंग या व्याधीने ग्रस्त झालेल्या व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याच्या सुचना सर्व प्रशासकीय विभागांना निर्गमित केलेल्या होत्या. त्यानुसार पशुसंवर्धन विभाग अपंग व्यक्ती (समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ च्या तरतूदीसह दिनांक ३० नोव्हेंबर १९९८ च्या क्रमांक पसंप्र १०९८/५१५५/प्र.क्र. २३/पदुम-१ नुसार पशुसंवर्धन विभागाअंतर्गत असलेल्या गट अ व ब ही पदे अंध, मुकबधिर व कर्णबधिर यामधून भरण्यास सुट देण्यात आली होती. परंतू अस्थिव्यंगासाठी १ टक्क्यापर्यंत सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्यात आले होते. तथापि मा. उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या याचिका क्र. १२९/०३ च्या अनुषंगाने सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभागाच्या सुचनेनुसार शासनाच्या सर्व विभागाच्या व अखत्यारातील पदांपैकी अपंगासाठी सुयोग्य पदे निश्चित करावयाची होती. त्यासाठी प्रधान सचिव, समाज कल्याण यांच्या अध्यक्षेतेखाली तज्ञ समितीही गठित करण्यात आली होती. त्या समितीने पशुसंवर्धन विभागाअंतर्गत असलेली पदे अपंगाच्या आरक्षणासाठी निश्चित केलेली आहेत. त्यानुषंगाने पशुसंवर्धन विभागाअंतर्गत अ, ब, क व ड गटातील कोणत्या पदास अपंग व्यक्तींसाठी आरक्षण ठेवावे. याबाबत शासन निर्णय पसंप्र २०४/प्र.क्र. ९७/पदुम-१ दि. १०/०२/२००५ व पसंप्र २४०८/प्र.क्र. २६४/पदुम-१ दि. ११/०२/२००९ नुसार विभागीय आरक्षण निश्चित केले आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने शासन निर्णय क्र. न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३ दि. ३ ऑगस्ट २०१० अन्वये केंद्र शासनाच्या यादीतील पदांव्यतिरीक्त जी पदे राज्य

शासनाच्या अखत्यारीतील शासकीय व निमशासकीय आस्थापनेवर आहेत, अशा पदांची अपंगांसाठी पदनिश्‍चिती करण्याचे सुचित केले आहे.

२. त्यास अनुसरुन कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त पशुसंवर्धन, पुणे कार्यालयातील सरळ सेवेत भरण्यात येणाऱ्या गट अ ते ड संवर्गातील पदांबाबत अपंगांसाठी पदे सुनिश्चित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता..

**शासन निर्णयः**

**१.** मा. उच्च न्यायालयाने पुनर्रचित करण्यात आलेल्या तज्ञ समितीने शासन निर्णयाचे पुनर्विलोकनानुसार शिफारसी विचारात घेवून संदर्भाधीन दि. ११/०२/२००९ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून या शासन निर्णयाअन्वये अपंगासाठी केंद्र शासनाप्रमाणे सुयोग्य पदाचे सुधारीत पदनिश्‍चिती करण्यात येत आहे.

**२.** अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार केंद्र शासनाने ज्या यादीन्वये त्यांच्या अखत्यारीतील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तीसाठी आरक्षण देण्यासाठी निश्‍चित केलेली आहेत त्या यादीशी तुलना करुन कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त पशुसंवर्धन, पुणे कार्यालयातील सरळ सेवेत भरण्यात येणाऱ्या गट अ ते ड संवर्गातील सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी (केंद्र शासनाच्या यादीतील समान पदे विचारात घेऊन) सोबत जोडलेल्या परिशिष्ट अ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपंगांसाठी पदे सुनिश्चित करण्यात येत आहेत.

**३.** अपंग व्यक्ती (समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ या अधिनियमातील कलम ३२ व ३३ अनुसार आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांच्या आस्थापनेअंतर्गत गट अ ते ड या संवर्गातील पदांवरील सरळसेवा भरतीमध्ये किमान ४० टक्के अपंगत्व असलेल्या अपंग व्यक्तीसाठी प्रत्येकी १ टक्के याप्रमाणे ३ टक्के आरक्षण लागु राहील. तसेच गट क व ड मध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०५/०३/२००२ च्या शासन निर्णयाप्रमाणे पदोन्नतीमध्ये आरक्षण लागु राहील.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०११३१८५४५२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

सही/-

(सु. तु. शेंडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रतः**

- आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१
- सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त द्वारा आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१
- उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- मा. मंत्री (पदुम), यांचे खाजगी सचिव
- मा. राज्यमंत्री (पदुम), यांचे खाजगी सचिव
- सचिव (पदुम), यांचे स्वीय्य सहाय्यक
- पदुम-१७, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
- निवड नस्ती (पदुम-१)

**परिशिष्ट अ**

**अपंग व्यक्तीसाठी सुयोग्य पदाची निश्चिती**

**प्रशासकीय नावः कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२**

**कार्यालयाचे नावः आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे-०१ व अधिनस्त कार्यालय**

| क्र. | पदनाम | शारिरीक योग्यता | सुयोग्य पदासाठी अपंगत्वाचा संवर्ग | पदाची कर्तव्य व जबाबदाऱ्या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन | ST, W, SE, RW, S, BM, MF | HH, OL | पशुसंवर्धन विभागातील तांत्रिक व प्रशासकीय कामांवर देखरेख करणे | -- |
| २ | पशुधन विकास अधिकारी गट-अ | ST, W, SE, H, RW, S, BN | HH, OL | पशुधनाची देखभाल तसेच औषधोपचार व त्यासंबंधीचे कागदपत्रांची जपणूक करणे | कामानुसार साहित्य व सामुग्रीचा वापर करणे. |
| ३ | वरिष्ठ लिपीक | SW, MF, SE, RW, H | OA, OL, BL, BLV, HH | लिपीक स्वरुपाचे सर्व कामकाज करणे | -- |
| ४ | कनिष्ठ लिपीक | S, ST, W, MF, SE, RW, C | BL, OL, B, LV, HH | लिपीक स्वरुपाचे सर्व कामकाज करणे | -- |
| ५ | लघुलेखक निम्नश्रेणी | S, ST, W, L, MF, SE, RW, H, C | OA, OL, BL, OAL, B, LV, HH | श्रृतलेखन घेणे व टंकलिखीत करणे स्वीय्य सहाय्यक म्हणून कामकाज करणे | -- |
| ६ | पशुधन पर्यवेक्षक | SE, H, R, RW | HH | पशुधनावर किरकोळ उपचार करणे पशुधन विकास अधिकाऱ्याला सहाय्य करणे तसेच कार्यालयाचे तांत्रिक कागदपत्रांचा सांभाळ करणे | -- |
| ७ | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | S, ST, W, BN, MF, SE, RW, H, C | OA, OL, OAL, BL, HH | प्रयोगशाळेमध्ये कृत्रिम रेतनाकरीता लागणाऱ्या गोठित रेतमात्रांची योग्यरित्या जपणूक करणे | कार्यालयात तसेच क्षेत्रावर जाऊन प्रत्यक्ष काम करणे व साहित्य सामुग्रीचा वापर करणे |
| ८ | सांख्यिकी सहाय्यक | S, ST, W, BN, MF, SE, RW | OL, BL, B, LV, HH | सांख्यिकी माहिती गोळा करणे तसेच माहितीच्या आधारे सुयोग्य वर्गीकरण, मांडणी व सादरीकरण करणे. | -- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९ | प्रमुख तारतंत्री | S, ST, W, L, MF | OL, HH | विजेच्या सामुग्रीचे जतन तसेच दुरुस्ती करणे | कामानुसार साहित्य व सामुग्रीचा वापर करणे. |
| १० | जोडारी | ST, BN, LMF | OL, BL, LV, HH | धातुच्या वस्तुंचे जोडणी हत्यारे व अवजारे वापरुन करणे | -- |
| ११ | वरिष्ठ बाष्पक परिचर | S, ST, W, BN, MF, SE | OL, HH | बाष्पकांचे जतन तसेच दुरुस्ती तसेच त्याचा वापर प्रयोगशाळेमध्ये करणे | -- |
| १२ | यांत्रिक | S, ST, BN, MF, SE | OL, BL, MW, HH | विविध यांत्रिक वस्तुंचे जतन तसेच दुरुस्ती करणे | -- |
| १३ | सुतार | S, ST, W, MF, PP, LH, SE | OL, BL, HH, LV | कार्यालयातील तसेच प्रयोगशाळेतील सर्व प्रकारचे लाकडी साहित्य बनविणे अथवा दुरुस्ती करणे | -- |
| १४ | चपराशी | S, ST, W, F, L, BN, PP, SE, H, KC, B, | OL, HH, LV, B | कार्यालयाची स्वच्छता ठेवणे, वरिष्ठ अधिकाऱ्यांना रेकॉर्ड उपलब्ध करुन देणे इ. स्वरुपाचे कामकाज करणे तसेच कार्यालयीन टपालाचे वाटप करणे | -- |
| १५ | गोठा परिचर | S, ST, W, L, BN, PP, SE, H, RW | OA, OL, HH, LV | गोठा साफसफाई तसेच पशुधनाची निगा राखणे | -- |
| १६ | मजूर | S, BN, MF, SE | OA, BL, OL, LV, B | नित्याचे अंगमेहनतीचे काम करणे | -- |
| १७ | सफाई कामगार | S, ST, W, BN, MF, SE | OL, HH | कार्यालय / वसतिगृह इमारतीची तसेच त्यातील स्वच्छतागृहे व स्नानगृहे यांची स्वच्छता राखणे | -- |

**ABBREVIATIONS USED:**

S- Sitting, BN- Bending, SE- Seeging, RW- Reading and writing, C- Communication, MF- Manipulation by Fingers
PP- Pulling and Pushing, L- Lifting, KC- Kneeling and Crouching, ST- Standing, W- Walking
BLA-Both legs and Arms, BA-Both Arms, OL-One Leg, BL-Both Legs, OA-One Arm, OAL-One Arm and One Leg,
B-Blind, LV-Low Vision, H-Hearing, MW-Muscular Weakness, OH- Orthopedic Handicapped, CP- Cerebral Palsy
LC- Leprosy Cured, VH- Visually Handicapped HH- Hearing Handicapped,